**महापारेषण कंपनीच्या ट्रान्समिशन सिस्टीम प्रोजेक्टसाठी जपान बँक फॉर इंटरनॅशनल को-ऑपरेशन कडून प्राप्त झालेल्या कर्जाच्या रकमेचे वितरण करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१(१)/ऊर्जा-३,**
शिबिर कार्यालय, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
दिनांक : २७.०१.२०१५.

**संदर्भ -**
१. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१/ऊर्जा-३, दि.०८/१०/२०१२.
२. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१(१)/ऊर्जा-३, दि.२६/२/२०१३.
३. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१(२)/ऊर्जा-३, दि.२६/२/२०१३.
४. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१(२)/ऊर्जा-३, दि.३०/०३/२०१३.
५. शा. नि. क्र. : पुनर्वि-२०१३/प्र.क्र.२३/ऊर्जा-३, दिनांक : ३० मार्च, २०१३.
६. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१/ऊर्जा-३, दि.०७/११/२०१३.
७. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१/ऊर्जा-३, दि.१८/०१/२०१४.
८. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१(१)/ऊर्जा-३, दि.३०/०३/२०१४.
९. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१(२)/ऊर्जा-३, दि.३०/०३/२०१४.
१०. शा. नि. क्र. : निधीवि-२०१२/२२८/प्र.क्र.५१/ऊर्जा-३, दि.०१/११/२०१४.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनीच्या ट्रान्समिशन सिस्टिम प्रोजेक्ट हया बाह्य सहाय्यित प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या पुढाकाराने जपान बँक फॉर इंटरनॅशनल को-ऑपरेशन कडून १६७४९ दशलक्ष जपानी येन (सुमारे ६२३ कोटी रुपये) कर्ज मंजूर झाले असून कर्जासंदर्भात महापारेषण कंपनी, जपान बँक फॉर इंटरनॅशनल को-ऑपरेशन आणि केंद्र शासन यांच्यात दि.१४.०९.२००७ रोजी करार झाला आहे. जपान बँकेकडून मिळणारी कर्जाची रक्कम केंद्र शासनाकडून भारतीय रिझर्व्ह बँकेमार्फत थेट महापारेषण कंपनीला वितरीत होत असली तरी ती राज्य शासनाच्या लेख्यांमध्ये वर्ग केली जाते. प्रस्तुत प्रकल्पासाठी राज्य शासनाच्या लेख्यात वर्ग झालेली रक्कम कंपनीला वितरीत करण्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उपलब्ध नसल्यामुळे महालेखापाल कार्यालयाने कर्जाच्या रकमा निलंबन खात्यामध्ये वर्ग केल्या होत्या. ह्या रकमा दीर्घ कालावधीसाठी निलंबन खात्यामध्ये वर्ग करुन ठेवणे योग्य नसल्यामुळे प्रकल्पासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उघडून मानीव तरतूद करण्याबाबत महालेखापाल कार्यालयाने सूचित केले आहे. त्यानुसार विभागाने प्रकल्पासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उघडले असून हया प्रकल्पासाठी वित्तीय वर्ष २००९-१० मध्ये कंपनीला थेट वितरीत झालेली रु.२२०.८३ कोटी इतकी रक्कम, वित्तीय वर्ष २०१०-११ मध्ये कंपनीला थेट वितरीत झालेल्या रु.३१२.००,६२ कोटी इतक्या रकमेपैकी रु.५८,५०,५०,०००/- आणि रु.१५०,००,००,०००/- इतकी रक्कम, वित्तीय वर्ष २०११-१२ मध्ये कंपनीला थेट वितरीत झालेली रु.११.८२ कोटी इतकी रक्कम, वित्तीय वर्ष २०१२-१३ मध्ये कंपनीला थेट वितरीत झालेली रु.३८.७८ कोटी इतकी रक्कम, वित्तीय वर्ष २०१३-१४ मध्ये कंपनीला थेट वितरीत झालेली रु.१७.६६ कोटी इतकी रक्कम वरील दहा शासन निर्णयान्वये नियमित करण्यात आल्या आहेत.

वित्तीय वर्ष २०१०-११ मध्ये कंपनीला थेट वितरीत झालेली रु.३१२.००६२ कोटी इतकी रक्कम पुरेशा नियतव्ययाअभावी पुस्तकी समायोजनेने पूर्णाशाने वितरीत करून नियमित करणे शक्य झालेले नाही, त्यामुळे त्यापैकी आतापर्यंत रु.२०८,५०,५०,०००/- इतकी रक्कम वितरीत करून नियमित करण्यात आली आहे, ती चालू वित्तीय वर्ष २०१४-१५ मध्ये अंशत: नियमित करणे शक्य आहे.

चालू वित्तीय वर्ष २०१४-१५ मध्ये प्रस्तुत प्रकल्पासाठी रु.१७५ कोटी इतका नियतव्यय मंजूर झाला असून त्यामधून आतापर्यंत रु.१५० कोटी इतका खर्च झाला आहे. उर्वरित रकमेतून महापारेषण कंपनीला ट्रान्समिशन सिस्टिम प्रोजेक्ट हया बाह्य सहाय्यित प्रकल्पासाठी वित्तीय वर्ष २०१४-२०१५ मध्ये वितरीत झालेली (माहे एप्रिल २०१४ ते माहे जून २०१४ पर्यंत) रु.२,२६,४७,०००/- (रुपये दोन कोटी सहवीस लाख सत्तेचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम पुस्तकी समायोजनाने खर्ची दाखविणे विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय :</u>**

महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनीच्या ट्रान्समिशन सिस्टिम प्रोजेक्ट हया बाह्य सहाय्यित प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या पुढाकाराने जपान बँक फॉर इंटरनॅशलन को-ऑपरेशन कडून मंजूर झालेल्या १६७४९ दशलक्ष जपानी येन (सुमारे ६२३ कोटी रुपये) इतक्या कर्जापैकी महापारेषण कंपनीला चालू वित्तीय वर्ष २०१४-२०१५ मध्ये वितरीत झालेल्या (माहे एप्रिल २०१४ ते माहे जून २०१४ पर्यंत) रु.२,२६,४७,०००/- (रुपये दोन कोटी सहवीस लाख सत्तेचाळीस हजार फक्त) इतक्या कर्जाऊ रकमेचे पुस्तकी समायोजन करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. ही रक्कम<br>
मागणी क्रमांक : के-११<br>
६८०१ - वीज प्रकल्पांसाठी कर्जे<br>
००<br>
१९० - सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे<br>
(००)<br>
(००)(०३) ट्रान्समिशन सिस्टीम प्रोजेक्ट या योजनेसाठी पारेषण कंपनीला कर्जे<br>
५५ - कर्जे व आगाऊ रकमा (६८०१ ०६५६)

ह्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर झालेल्या तरतुदीमधून समायोजित
करण्यात यावी.

३. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन, महालेखापाल, मुंबई यांचे अखत्यारीत व अधिकारात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई यांनी त्यांच्या अखत्यारीत व अधिकारात रु.२,२६,४७,०००/- (रुपये दोन कोटी सहवीस लाख सत्तेचाळीस हजार फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

**५.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३९३/१४६१, दि.०१/१२/२०१४ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३३/१४/व्यय-१६, दि.२६/१२/२०१४ आणि अनौपचारिक संदर्भ क्रमांक ९७/१४/ऋवह कक्ष, दि. १२/०१/२०१५ अनुसार त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०१२८१४०४२०२७१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकिंत करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labor, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2015.01.28 14:15:40 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०० ०२०.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कं. मर्या., प्रकाशगंगा,वांद्रे (पूर्व), मुंबई.
६. मुख्य अभियंता (विद्युत), सा.बां.वि.,बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
७. नियोजन विभाग (का-१४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
८. वित्त विभाग(अर्थसंकल्प-१४/व्यय-१६/ऋण व हमी कक्ष/साधनसंपत्ती कक्ष/सा.उ.कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.
९. विशेष कार्यअधिकारी (महापारेषण कंपनी) कार्यासन ऊर्जा -४.
१०. अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. क.अ.(प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवड नस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.